सन २०२१-२०२२ वर्षाकरीता विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नवीन व्यवसाय/ जादा तुकडया सुरु करण्यास इरादापत्र ( LOI ) देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आयटीआय- २०२१/प्र.क्र.११७/व्यशि-३**

दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०२१

वाचा :-

१) कौशल्य विकास व उद्योजकता विभाग शासन निर्णय क्रमांक:- आयटीसी २२१७/प्र.क्र.२३२/व्यशि-३, दिनांक ०७ फेब्रुवारी,२०१८
२) शासन शुध्दीपत्रक क्र. आयटीसी-२२१७/प्र.क्र.२३२/व्यशि-३ दि. २३ मे, २०१९
३) विभागाचे पत्र क्र.व्हिओसी-२०१७/प्र.क्र.१५७/व्यशि-४, दि. १२ जुन, २०२० दि.२८ जुलै,२०२०
४) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. खाऔप्रसं/इरादापत्र /प्रस्ताव-२०२०/०४, दि.०८.०१.२०२१
५) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ खाऔप्रसं/इरादापत्र /प्रस्ताव-२०२१/२७, दि.२६.०४.२०२१.
६) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ खाऔप्रसं/इरादापत्र /प्रस्ताव-२०२१/५०, दि.१९.०७.२०२१.
७) संचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र.८ खाऔप्रसं/इरादापत्र /प्रस्ताव-२०२१/६०, दि.११.०८.२०२१.

**प्रस्तावना :**

कौशल्य विकास व उदयोजकता विभाग, दि. ०७ फेब्रुवारी, २०१८ च्या शासन निर्णयान्वये कायम विनाअनुदान तत्त्वावर नवीन खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करणे आणि विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नवीन व्यवसाय, जादा तुकडी, व्यवसाय बदल करण्याकरिता ऑनलाईन पध्दतीने शासनाचे इरादापत्र (LOI) प्राप्त करण्यासाठीच्या प्रमाणित कार्यपध्दतीस मान्यता देण्यात आलेली आहे. उपरोक्त शासन निर्णय संदर्भात दि. २३ मे, २०१९ च्या शुध्दीपत्रान्वये कार्यपध्दतीत सुधारणा करण्यात आलेली असून खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना ईरादापत्राकरीता प्रत्यक्ष पडताळणी वगळून संस्थांनी ऑनलाईन पध्दतीने सादर केलेल्या कागदपत्रांची छाननी करण्यात येऊन कागदपत्रांच्या व हमीपत्राच्या आधारे संगणक प्रणालीव्दारे राज्य शासनाचे इरादापत्र देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. विभागाच्या दि. १२ जून, २०२० च्या पत्रा अन्वये शासनाने मान्यता देण्याच्या कार्यपध्दतीस तसेच त्याबाबतच्या कालबध्द कार्यक्रमास देखिल मंजुरी दिली आहे.

सन २०२१-२०२२ करीता कायमविना अनुदान तत्त्वावर नवीन खाजगी औ.प्र.संस्था सुरु करणे आणि विद्यमान खाजगी औ.प्र.संस्थांमध्ये नवीन व्यवसाय/जादा तुकडी/व्यवसाय बदल

करण्याकरिता शासनाचे इरादापत्र (LOI) प्राप्त करण्यासाठी ज्या संस्थांनी संचालनालयाच्या vti.dvet.gov.in या वेबपोर्टलवर ईरादापत्राकरीता ऑनलाईन अर्ज केले होते. त्या संस्थांपैकी पात्र असलेल्या संस्थेला विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये नवीन व्यवसाय, जादा तुकडी, व्यवसाय बदल करण्याकरीता मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

सन २०२१-२०२२ या वर्षापासून कायम विना अनुदान तत्वावर नवीन खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करणे आणि विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नवीन व्यवसाय, जादा तुकडी, व्यवसाय बदल करण्याकरीता संदर्भ क्र. ६ व ७ अन्वये संचालनालयाकडून दि.१९.०७.२०२१ व दि. ११.०८.२०२१ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावातील विहीत मानकांची पुर्तता करणा-या सोबत सहपत्र “ब” मध्ये नमूद ०१ विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नवीन व्यवसाय/जादा तुकडी सुरु करण्याकरीता कायम विनाअनुदान तत्वावर खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून संबधित संस्थेला इरादापत्र (LOI) देण्यात येत आहे.

अटी व शर्ती:-

१. व्यवसाय अभ्यासक्रम कायमस्वरुपी विनाअनुदान तत्वावर चालविण्यात येतील.
२. ज्या व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी राज्यशासनाचे इरादापत्र (LOI) निर्गमित करण्यात येत आहे त्या सर्व व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी डी.जी.टी, नवी दिल्ली यांचे मानकांनुसार आवश्यक यंत्रसामुग्री,जागा,विजपुरवठा,अर्हताधारी कर्मचारी वर्ग व इतर बाबींची पुर्तता १०० टक्के पुर्तता संस्थेने करणे बंधनकारक राहील.
३. इरादापत्र (LOI) करीता शिफारस करण्यात आलेल्या संस्थांना मंजूर व्यवसायांसाठी डी.जी.टी, नवी दिल्ली यांचे संलग्नता निकषानुसार (Affiliation Norms ) आवश्यक त्या सर्व बाबींची १०० टक्के पूर्तता करुन डी.जी.टी., नवी दिल्ली यांची संलग्नता प्राप्त करुन घ्यावी लागेल तसेच डी.जी.टी., नवी दिल्ली यांची संलग्नता प्राप्त झाल्यानंतर व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाकडून प्रवेशास परवानगी प्राप्त करुन घ्यावी लागेल. सदर परवानगी प्राप्त झाल्याशिवाय प्रत्यक्ष विद्यार्थी प्रवेश करता येणार नाही अन्यथा संस्था संबंधित संस्था “ महाराष्ट्र राज्यात कृषि, पशु व मत्स्य विज्ञान,आरोग्य,उच्च,तंत्र व व्यवसाय शिक्षण यामधील अनाधिकृत संस्था स्थापन करणे आणि अनाधिकृत अभ्यासक्रम पाठयक्रम सुरु करणे (प्रतिबंध) अधिनियम,२०१३” प्रमाणे कायदेशिर कारवाईस पात्र राहील.
४. सदर संस्थांना प्रवेशपरवानगी पत्र निर्गमित करताना त्या संस्थेने नियमानुसार सर्व बाबींची पुर्तता केली आहे किंवा नाही याची तपासणी करण्याची जबाबदारी संचालनालयाची राहील.
५. कौशल्य विकास व उदयोजकता विभाग शासन निर्णय दि.०७/०२/२०१८ नुसार नवीन खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेसाठी प्रथम चार तुकडयांपर्यत रु. १,००,०००/- व त्यापुढील प्रत्येक तुकडीस रु. २५०००/- तसेच विद्यमान संस्थेसाठी रु. २५०००/- प्रति तुकडी इतकी अनामत रक्कम संचालनालयास भरल्याशिवाय प्रवेशास परवानगी दिली जाणार नाही.

६. डी.जी.टी., नवी दिल्ली, नवी दिल्ली यांची संलग्नता व व्यवसाय शिक्षण प्रशिक्षण संचालनालयाकडून प्रत्यक्ष प्रवेशास परवानगी प्राप्त नसताना विद्यार्थ्यांना प्रवेश देऊ नयेत, असे अनधिकृत प्रवेश दिल्यास सदर प्रवेशित विद्यार्थ्यांना कोणत्याही समुचित प्राधिकरणाच्या परिक्षेस बसण्याची परवानगी देण्यात येणार नाही व त्यामुळे उध्दवणाऱ्या सदर विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक नुकसानाची जबाबदारी संस्थेची राहील.

७. विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याबाबत जे शासकीय प्रचलित नियम आहेत त्यानुसार प्रवेश देणे बंधनकारक आहे, त्यानुसार प्रवेश देण्यात येतील.

८. महाराष्ट्र शासन व डि.जी.टी. नवी दिल्ली यांनी मान्यता दिलेल्या व्यवसाय अभ्यासक्रमाकरिता मंजूर प्रवेशक्षमतेपेक्षा अधिकचे प्रवेश दिले जाणार नाहीत.

९. ज्या आर्थिक वर्षात इरादापत्र प्राप्त होईल, ते आर्थिक वर्ष जोडून ३ वर्षाच्या आत डी.जी.टी,नवी दिल्ली यांच्याकडून संलग्नता मिळविणे बंधनकारक राहील. खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांना देण्यात येणाऱ्या इरादापत्राची वैधता ३ वर्षापर्यतच राहील, अन्यथा नवीन खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था व विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील नवीन व्यवसाय,जादा तुकडी,व्यवसाय बदल इ. करिता देण्यात आलेले इरादापत्र आपोआप संपुष्टात येईल.

१०. नवीन खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करण्यांसाठी तसेच विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये नवीन अभ्यासक्रम,जादा तुकडी सुरु करण्यासाठी इरादापत्र (LOI) मान्यता देण्यात आलेल्या संस्थांच्या व्यवसाय अभ्यासक्रमाकरिता शासनाच्या, डी.जी.टी. नवी दिल्ली व व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या प्रचलित नियमात वेळोवेळी जे बदल होतील तसेच राज्य शासनाचे /संचालनालयाचे वेळोवेळी निर्गमित होणारे आदेशाचे पालन काटेकोरपणे न केल्यास किंवा प्रवेश, संलग्नता,परिक्षा इ. बाबत कोणत्याही स्वरुपाची अनियमितता केल्यास संस्थेस देण्यात आलेले ईरादा पत्राची मान्यता तात्काळ रद्द करण्यात येईल.

११. प्रवेश करण्यात येत असलेल्या सर्व व्यवसाय अभ्यासक्रमासाठी डी.जी.टी. नवी दिल्ली यांच्या मानकांनुसार संस्थेत प्रशिक्षणासाठी विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत सोयी सुविधा उपलब्ध असाव्यात.

१२. शासनाने निश्चित केलेले प्रशिक्षण शुल्क व अन्य शुल्क खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेस बंधनकारक राहील व या व्यतिरिक्त कोणतेही शुल्क संस्थेस प्रशिक्षणार्थ्यांना आकारता येणार नाही.

१३. प्रत्यक्ष विद्यार्थी प्रवेशाची संख्या सतत तीन वर्ष मंजुर प्रवेश क्षमतेच्या ५०% पेक्षा कमी असल्यास अभ्यासक्रमाची मान्यता आपोआप रद्द होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११११८१५०२५९४४०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2021.11.18 15:07:05 +05'30'

**( विनोद बोंदरे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत ,**

१.मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव,
२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३.सर्व मा. मंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४.सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५.मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
६.सर्व विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य
७.मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
८.मा. अपर मुख्य सचिव ,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक मंत्रालय,मुंबई
९. सचिव ,कौशल्य विकास व उद्योजकता विभाग यांचे वरिष्ठ स्वीय सहायक , मंत्रालय,मुंबई
१०.संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक, (शालेय शिक्षण विभाग), (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१२. सहसंचालक,व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय,मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/नागपूर (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१३. संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, ( व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१४. संबंधित अशासकीय संस्था (व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१५. सर्व कार्यासने, कौशल्य विकास व उद्योजकता विभाग,मंत्रालय,मुंबई.
१६. निवड नस्ती. (व्यशि-३).

| सहपत्र ब<br>कायम विना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आलेल्या विद्यमान खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये वाढीव व्यवसाय /वाढीव तुकडीकरीताच्या संस्थांची यादी | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेचे नांव व पत्ता | संस्थेस परवानगी दिलेल्या व्यवसाय/तुकडया | |
| | | व्यवसाय | तुकडया |
| १ | २ | ३ | ४ |
| विभागांचे नांव - मुंबई | | | |
| १ | डॉन बॉस्को खाजगी औद्योगिक प्रशिक्षण संस्था, प्रिमियर ॲटोमोबाईल्स रोड, कुर्ला वेस्ट, मुंबई ४०००७०. | इलेक्ट्रिशियन मेकेट्रॉनिक्स | वाढीव तुकडया २ (१+१+०) |